महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, सहसंचालक संवार्गतील अधिकाऱ्यांना संचालक पदावर तात्पुरती पदोन्नती व पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन आदेश क्रमांक:-संलेको-२०२३/प्र.क्र.८६/कोषा.प्रशा.२,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २१.८.२०२३.

**शासन आदेश**

महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, सहसंचालक (एस-२५) (७८,८००-२,०९,२००) संवर्गातील खालील विवरणपत्रात नमूद अधिकाऱ्यांना महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, संचालक संवर्गात (एस-२९) (१३१,१००-२,१६,६००) या वेतनबॅण्डमध्ये पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून खालील अटींच्या अधिन राहून तात्पूरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, पदोन्नत अधिकाऱ्यांना महसूल वाटप अधिनियम दिनांक १४.०७.२०२१ मधील तरतूदीनुसार स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या महसूल विभाग वाटपानुसार स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद केलेल्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | वाटप करण्यात आलेला महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.जितेंद्र विश्वनाथ कोळंबे | पुणे | वित्त व लेखा अधिकारी,महाराष्ट्र सीओईपी तंत्रज्ञान विद्यापीठ,पुणे |
| २ | श्री. निलेश तुकाराम राजूरकर | कोकण-२ | संचालक, स्थानिक निधी,लेखा परीक्षा, नवी मुंबई. |
| ३ | श्रीम. मोना कृष्णकुमार ठाकुर | नागपूर | वित्त व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर, |
| ४ | श्रीम. स्मिता मनिष कुलकर्णी | कोकण-२ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे |
| ५ | श्रीम. अस्मिता सुधाकर बाजी, | पुणे | संचालक,महाराष्ट्र संशोधन,उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी(अमृत),पुणे(प्रतिनियुक्ती) |
| ६ | श्री. नरेंद्र दिगंबर महाजन | नाशिक | मुख्य लेखा व वित्त अधिकारी,तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगांव |
| ७ | श्री. संजय प्रभाकरराव पतंगे | कोकण-२ | प्रपत्र बढती-<br>मुख्य लेखापरीक्षक,ठाणे महानगरपालिका,ठाणे. |
| ८ | श्रीम. दीपा संदीप सडेकर | पुणे | प्रपत्र बढती-<br>महाव्यवस्थापक(ले व लेप) तथा वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र वखार महामंडळ,पुणे. |
| ९ | श्रीम. सुवर्णा राहुल पांडे | नागपूर | संचालक तथा सहायक प्राध्यापक(अर्थशास्त्र), वनामती, नागपूर (प्रतिनियुक्ती) |

२. (अ) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ०७.०५.२०२१ अन्वये दिलेल्या सुचनानुसार तसेच सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च

न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून उपरोक्त विवरणपत्रातील अधिकाऱ्यांना तात्पूरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

(ब)सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

(क)सदरचे पद हे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतील असल्यामुळे सदर पदोन्नती/निवडसुची लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित करण्यात येईल.

३. वरील अधिकाऱ्यांनी आपल्या पदोन्नत पदाचा कार्यभार या आदेशाच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत त्वरीत स्वीकारावा व तसे केल्याबद्दल कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र या विभागाकडे पाठवावे. विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारल्यास अथवा पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी मुदतवाढ न मिळाल्यास पदोन्नतीचे आदेश रद्द करण्यात येतील.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १६.२.२०१८ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार प्रतिनियुक्तीच्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना दर्शविण्यात आली आहे.

५. उपरोक्त पदोन्नत अधिकाऱ्यांना शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०२०/ प्र.क्र.४९/कार्या.१२ दि. १४.०७.२०२१ मधील सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०८२११४२०२४४७०५ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUGDHA NITIN DHURI

Digitally signed by MUGDHA NITIN DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=cf57b0402df957a7d20b051925b771cb1d70227a5d6a66673b7656596a962b41, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=43B82982D7CE8CB63F33F9D9AE085C7E452884CA6ED53708069BD26F9BE61D71, cn=MUGDHA NITIN DHURI
Date: 2023.08.29 11:48:22 +05'30'

**(मु. नि. धुरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२) अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
४) संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई
५) मा. उपमुख्यमंत्री यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) संबंधित अधिकारी
७) संबंधित अधिकारी यांचे सध्याचे कार्यालय प्रमुखः
८) संबंधित अधिकारी यांचे पदोन्नतीच्या पदाचे कार्यालय प्रमुख,
९) अप्पर मुख्य सचिव (ले. व को.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
(१०) कक्ष अधिकारी, कोषा. प्रशा. १, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
(११) निवड नस्ती कोषा प्रशा.२, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई यांचेमार्फत.